जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत मौजे मोरचिडा (ता. चोपडा, जि.जळगाव) येथील योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

### पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु - २०२३/प्र.क्र.५७६/पापु १८**

**७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,**

**लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१**

**दिनांक: २४ एप्रिल, २०२३.**

वाचा :-

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांचे प्रशासकीय मान्यता आदेश, दिनांक १५.११.२०२२

२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगाव यांचे मूळ तांत्रिक मान्यता आदेश, दिनांक २८.०९.२०२२

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांचे पत्र जा.क्र./ग्रापापु/निविदा/सुप्रमा/९१/२०२३, दिनांक २०.०२.२०२३

प्रस्तावना :-

मौजे मोरचिडा (ता.चोपडा, जि.जळगाव) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्रमांक १ अन्वये मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. संदर्भ क्रमांक २ अन्वये कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगाव यांनी मुळ अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत आराखडयास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव, जादा दराच्या निविदा स्वीकृतीस कार्योत्तर मान्यता देण्यासह संदर्भाधीन पत्र क्रमांक ३ अन्वये शासनास सादर केला आहे. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या जादा दराच्या निविदा स्वीकृतीस कार्योत्तर मान्यता व सुधारीत आराखडयास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

मौजे मोरचिडा (ता. चोपडा, जि.जळगाव) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रू.५७.३९ लक्ष (ढोबळ) (अक्षरी रू. सत्तावन्न लक्ष एकोणचाळीस हजार फक्त) एवढ्या सुधारीत किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील **अटींच्या** अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

## अटी

१. उपरोक्त नमुद सुधारीत किंमतीत उर्वरित सर्व कामे विहित मुदतीत पूर्ण करावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

९. जल जीवन मिशन अंतर्गत प्रशासकीय खर्च अनुज्ञेय नसल्याने जर सदर योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकामध्ये ४ टक्के प्रशासकीय खर्च घेण्यात आलेला असेल, तर तो वगळण्यात यावा.

१०. सदरची निविदा प्रक्रिया योग्यप्रकारे पार पाडण्यात आली आहे, याची खातरजमा जिल्हा परिषद स्तरावर करण्यात यावी.

**०२.** या योजनेच्या सुधारीत किंमतीतील वाढीव खर्च हा जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

०३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१२२००३०१४६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA GORAKH BHARATE

Digitally signed by RAVINDRA GORAKH BHARATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD232EB47EB633CB760C7BD2ACF421B01B1DA040DC965254760018B5F4E33BE5, cn=RAVINDRA GORAKH BHARATE
Date: 2023.05.09 12:47:22 +05'30'

**(डॉ.रविंद्र गो. भराटे)**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद.
४) मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)

५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६) जिल्हाधिकारी, जळगाव.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव.
८) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
९) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
१०) अभियान संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक.
१२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जळगाव.
१३) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१४) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
१५) वरिष्ठ भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, जळगाव.
१६) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, जळगाव.
१७) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगाव.
१८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१९) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२०) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२१) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२२) कार्यासने (पापु-०४ व २०), पा. पु. व स्व.वि., मंत्रालय,मुंबई-३२.
२३) निवड नस्ती कार्यासन पापु-१८.